**नवनिर्मित नगरपरिषद/ नगरपंचायत यांच्या प्रशासक पदी नियुक्त करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या पार <u>पाडण्याबाबत....</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एमसीओ २०१५/प्र.क्र. ६४/नवि १४**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक: १२ मार्च, २०१५**

**<u>परिपत्रक</u> :-**

महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील तरतूदीनुसार राज्य शासनाने तालुका मुख्यालयांच्या ठिकाणी नगरपरिषदा/ नगरपंचायती स्थापन करण्याबाबत निर्णय घेतला असून, त्या अनुषंगाने राज्यातील तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी नगरपरिषद/ नगरपंचायत स्थापन करण्याचा शासनाचा उद्देश असल्याबाबत प्राथमिक उध्दोषणा दिनांक ०१.०३.२०१४ रोजी निर्गमित करण्यात आलेली आहे. सदरहू प्राथमिक उध्दोषणेच्या अनुषंगाने नगरपरिषदा/ नगरपंचायतींचे अंतिमत: गठन करण्याबाबतचे आदेश शासनामार्फत निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही सुरू आहे.

०२. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील कलम ३४० (२) (१) मधील तरतूदीनुसार नगरपरिषदा/ नगरपंचायत स्थापित होऊन अधिनियमातील तरतूदीनुसार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेची यथोचित रचना होईपर्यंतच्या कालावधीत नगरपरिषद/ नगरपंचायतींशी संबंधित सर्व अधिकार व कर्तव्ये पार पाडण्यासाठी प्रशासकाची नियुक्ती करण्याची तरतूद आहे. नगरपरिषदा/ नगरपंचायती स्थापित करण्यात आल्यानंतर उपरोक्त कलम ३४० (२) (१) मधील तरतूदीनुसार संबंधित "**तालुक्याचे तहसिलदार**" यांना "**प्रशासक**" म्हणून नियुक्त करण्याबाबत अधिसुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आलेले आहे की, प्रशासकाकरीता विहित करण्यात आलेली कर्तव्ये व जबाबदाऱ्या नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींच्या प्रशासक पदी नियुक्त करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांकडून पार पाडल्या जात नाहीत.

०३. उपरोक्त अनुषंगाने नवनिर्मित नगरपरिषद/ नगरपंचायतीच्या प्रशासक पदी नियुक्त करण्यात आलेल्या संबंधित "प्रशासक" (संबंधित तालुक्याचे तहसिलदार) यांनी त्यांना प्रशासक म्हणून अधिनियमाद्वारे विहित केलेल्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये पार पाडण्याची दक्षता घ्यावी.

०४. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन व संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना विनंती करण्यात येते की, नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींच्या "प्रशासक"

पदी नियुक्त करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांकडून त्यांना विहित करण्यात आलेल्या जबाबदाऱ्या, कर्तव्ये पार पाडल्या जातील याची कृपया खातरजमा करावी.

०५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींचे कामकाज सुरळीत व अधिनियमातील तरतुदीनुसार होईल याची दक्षता घ्यावी.

०६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१३१०४२३१९८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao Nanasaheb Patil
Date: 2015.03.13 10:53:51 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ०३०.
२. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व उपविभागीय अधिकारी
५. सर्व तहसिलदार
६. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
७. निवड नस्ती/ नवि १४